**मृद व जलसंधारण विभाग अतंर्गतच्या**
**दक्षता पथकांच्या चौकशीच्या कार्यवाही**
**संदर्भातील सुचना**

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग,**
**शासन परिपत्रक क्रमांक आढावा-२०२४/प्र.क्र.२८/जल-१६**
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-३२
दि. २० फेब्रुवारी,२०२५

**वाचा:** १. ग्रामविकास व जलसंधारण विभाग, शासन निर्णय क्र.आस्थाप-२०१६/प्र.क्र.८८(भाग-९)/जल-२ दि.३१/०५/२०१७

२. मृद व जलसंधारण विभाग, शासन परिपत्रक्र क्र.आस्थाप-२०१८/प्र.क्र.१३६/जल-२,दि.२८/०८/२०१८

३. मृद व जलसंधारण विभाग, शासन परिपत्रक क्र.दक्षता-२०२२/प्र.क्र.३२/जल-१६, दि.२१/०४/२०२२

४. मृद व जलसंधारण विभाग, शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.४८६/जल-१, दि.०३/०१/२०२५

**शासन परिपत्रक**

मृद व जलसंधारण विभागाकडून कार्यान्वयीत होणाऱ्या योजना/कामांशी संबंधीत शासनास प्राप्त झालेल्या तक्रारी ह्या कार्यक्षेत्रानुसार प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी, प्रादेशिक दक्षता व गुणनियत्रण पथक, नागपूर, पुणे, छत्रपती संभाजीनगर या संबंधीत कार्यालयांना चौकशीसाठी पाठविण्यात येतात. सदर तक्रारींच्या चौकशीसाठी /कामांच्या तपासणीसाठी आवश्यक असलेले कागदपत्र/अभिलेख संबंधीत क्षेत्रीय कार्यालयांकडून (प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, जिल्हा जलसंधारण अधिकारी, उपविभागीय जलसंधारण अधिकारी) कोणत्याही वाजवी कारणाशिवाय, दक्षता पथकांना तात्काळ उपलब्ध करून दिले जात नाहीत. ही बाब प्रशासकीय शिस्तीस बाधा आणणारी असून ती अत्यंत आक्षेपार्ह आहे. शिवाय, यामुळे दक्षता पथकांकडून प्राथमिक चौकशीचे अहवाल शासनास सादर करण्यास विलंब होत असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. या पार्श्वभुमीवर पुढीलप्रमाणे सुचना देण्यात येत आहेत:-

१. प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी, दक्षता व गुणनियंत्रण पथक, नागपूर, पुणे, छत्रपती संभाजीनगर या कार्यालयांचे (दक्षता पथक) पत्र मिळाल्यापासुन वाजवी व समाधानकारक कारण असेल ती प्रकरणे खेरीज करून १० कार्यालयीन दिवसांच्या आत, संबंधीत क्षेत्रीय कार्यालय प्रमुखाने चौकशीशी/तपासणीशी संबंधीत अभिलेख/कागदपत्रे दक्षता पथकांना उपलब्ध करून द्यावीत.

२. चौकशी/तपासणीशी संबंधीत अभिलेख विहित वेळेत उपलब्ध करून न देणाऱ्या संबंधीत क्षेत्रीय कार्यालय प्रमुखांविरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ मधील नियम, १० नुसार शिस्तभंगविषयक कार्यवाहीचा प्रस्ताव संबंधीत दक्षता पथकांने शासनास सादर करावा.

३. शासन स्तरावरून चौकशीसाठी प्राप्त होणाऱ्या तक्रारींच्या अनुषंगाने संबंधीत दक्षता पथकांनी चौकशी करून ३० दिवसांच्या आत (तक्रार गंभीर स्वरुपाची असल्यास १५ दिवसांच्या आत) प्राथमिक चौकशी अहवाल शासनास सादर करावा. तसेच, ज्या प्रकरणामध्ये प्रारुप दोषारोपपत्र सादर करण्याचे निर्देश देण्यात आले असतील अशा प्रकरणांमध्ये १५ दिवसांच्या आत पुरक कागदपत्रांसह प्रारुप दोषारोपत्र शासनास सादर करावीत.

४. विहित वेळेत प्रारुप दोषारोपपत्र शासनास सादर न करणाऱ्या सर्व संबंधीत कार्यालय प्रमुखा विरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ च्या नियम, १० नुसार शासन स्तरावरून शिस्तभंगविषयक कार्यवाही सुरू करण्यात येईल, याची नोंद घेण्यात यावी.

५. मृद व जलसंधारण विभागाकडून कार्यान्वयीत होणाऱ्या योजना/कामांशी संबंधीत प्राप्त सर्व स्तरावरील (आयुक्त, मृद व जलसंधारण, छत्रपती संभाजीनगर, अप्पर आयुक्त जलसंधारण, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे/नागपूर, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, छत्रपती संभाजीनगर, महासंचालक,जल व भुमी व्यवस्थापन संस्था (वाल्मी), छत्रपती संभाजीनगर सर्व प्रादेशिक जलसंधारण अधिकारी कार्यालये, सर्व जिल्हा जलसंधारण अधिकारी कार्यालये, सर्व उपविभागीय जलसंधारण अधिकारी कार्यालये इ. ) तक्रारींची चौकशी दक्षता पथकामार्फत करण्यात यावी. त्यासाठी सर्व क्षेत्रीय कार्यालयांकडे प्राप्त होणारे तक्रार अर्ज त्यांनी संबंधीत कार्यक्षेत्रातील दक्षता पथकांकडे पाठवावे.

उपरोक्त सुचनांचे काटेकोरपणे पालन करण्याची दक्षता मृद व जलसंधारण विभागातंर्गत कार्यरत सर्व क्षेत्रीय कार्यालयांनी घ्यावी या सुचनांचे पालन करण्यात कसुरी करणाऱ्यांविरुध्द शिस्तभंगविषयक कार्यवाही करण्यात येईल याची नोंद घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२२०१५५८४३५१२६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHUBHANGI ASHAY POTE

Digitally signed by SHUBHANGI ASHAY POTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=d3d1ef889c3b61818ab5b80cdd80adb67987d7b4d67fdd30609196e3c42a626a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A3686057BA04185ADDB654EDEC4DE91E5E9AA1E243BAE1702175810F69A3E15, cn=SHUBHANGI ASHAY POTE
Date: 2025.02.20 16:02:45 +05'30'

**(शुभांगी पोटे)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.मा. मंत्री, मृद व जलसंधारण विभाग, यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्य मंत्री मृद व जलसंधारण विभाग, यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३.मा. सचिव, मृद व जलसंधारण यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४.आयुक्त, मृद व जलसंधारण, आयुक्तालय, छत्रपती संभाजीनगर.
५.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र जलसंधारण महामंडळ, छत्रपती संभाजीनगर.
६.महासंचालक, वाल्मी, छत्रपती संभाजीनगर.
७.मुख्य अभियंता तथा पदसिध्द सह सचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
८. अप्पर आयुक्त जलसंधारण, मृद व जलसंधारण प्रादेशिक क्षेत्र, पुणे,नागपूर
९. सर्व प्रादेशिक दक्षता व गुणनियंत्रण अधिकारी, दक्षता व गुणनियंत्रण पथके
१०.सर्व प्रादेशिक जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग
११. सर्व जिल्हा जलसंधारण अधिकारी, मृद व जलसंधारण विभाग
१२. सर्व जिल्हा जलसंधारण अधिकारी, जिल्हा परिषद (लघु पाटबंधारे) विभाग
१३. सर्व उपविभागीय जलसंधारण अधिकारी, कार्यालये
१४. निवड नस्ती कार्यासन जल-१६, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.